एका पदावरून, अधिक महत्त्वाची कर्तव्ये आणि जबाबदाऱ्या असलेल्या दुसऱ्या पदावर पदोन्नती/नियुक्ती झाल्यानंतर करावयाची वेतन निश्चिती.

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

**शासन निर्णय क्रमांक वेपुर. १२८८/५८०/सेवा-१०**

**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १८ ऑक्टोबर १९८८**

## शासन निर्णय

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक पीएवाय. १०८२/सीआर-११०० (दोन)/सेवा-३, दिनांक ६ नोव्हेंबर १९८४ अन्वये असे आदेश देण्यात आले आहेत की, वर्ग एक मधील ज्या पदांचे विद्यमान श्रेणीतील प्रारंभिक वेतन रु. १५०० पर्यंत आहे अशा पदांवर पदोन्नती/नियुक्ती झाल्यानंतर संबंधित कर्मचाऱ्याचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ च्या नियम ११ (१) (ए) मधील तरतुदीनुसार निश्चित करण्यात यावे. म्हणजेच, अशा कर्मचाऱ्यांचे वेतन, वरच्या पदाच्या वेतनश्रेणीमधील अशा टप्प्यावर निश्चित करण्यात यावे जो टप्पा खालच्या पदामधील त्याने घेतलेले वेतन एक वेतनवाढ देऊन काल्पनिकरित्या वाढविल्यानंतरचा असेल. हा लाभ वर्ग एक मधील इतर अधिकाऱ्यांना देण्याचा प्रश्न शासनाच्या काही काळ विचाराधीन होता.

२. या संदर्भातील विद्यमान सर्व आदेशांचे अधिक्रमण करून शासन असा आदेश देत आहे की, जेव्हा शासकीय कर्मचाऱ्याची, त्याने धारण केलेल्या पदाची कर्तव्ये आणि जबाबदाऱ्या यांपेक्षा अधिक महत्त्वाची कर्तव्ये आणि जबाबदाऱ्या असलेल्या पदावर पदोन्नती/नियुक्ती होईल तेव्हा महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ च्या नियम ११ (१) (ए) मधील तरतुदी, कोणत्याही वेतनाची मर्यादा न घालता, लागू करण्यात याव्यात.

३. हे आदेश दिनांक १ जानेवारी १९८६ पासून अंमलात येतील.

४. या आदेशामुळे देय होणारी दिनांक १ जानेवारी १९८६ ते ३१ ऑगस्ट १९८८ (दोन्ही दिवस धरून) पर्यंतच्या कालावधीची थकबाकी शासकीय कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधी खात्यात जमा करण्यात यावी आणि १ डिसेंबर १९९१ पर्यंतच्या तीन वर्षांच्या कालावधीत ती काढून घेण्याची त्याला परवानगी असणार नाही. परंतु या कालावधीमध्ये शासकीय सेवेमधून सेवानिवृत्त झालेले किंवा अशा सेवेत राहण्याचे बंद झालेले शासकीय कर्मचारी याला अपवाद राहतील.

५. महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील या संबंधीच्या विद्यमान तरतुदी या निर्णयामधील तरतुदीच्या मर्यादेपुरत्या सुधारित करण्यात आल्या आहेत असे समजण्यात यावे. या नियमांना औपचारिक सुधारणा यथावकाश करण्यात येईल.

६. या आदेशाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**व्यं. दे. पानसे,**

**शासनाचे सहसचिव.**

(शा.म.मु.) एच १८२२ (१५,०००—१०-८८)

प्रति—

महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
राज्यपालांचे सचिव.
मुख्य मंत्र्यांचे सचिव.
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक.
मंत्रालयीन सर्व विभाग.
सर्व विभागीय आयुक्त.
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख.
*प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई.
*प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
*सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई.
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्र. २६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली.
संचालक, लेखा व कोषागारे मुंबई.
मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई.
उप मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती.
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
वित्त विभागातील सर्व कार्यासने.
निवड फाईल, वित्त विभाग—सेवा-१०.

*पत्राद्वारे

१९८८ चा क्रमांक

माहिती व मार्गदर्शनाकरिता प्रत रवाना.